**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील, आयुष संचालनालय व त्याच्या अधिपत्याखालील विभागप्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख, कार्यालय प्रमुख म्हणून कार्यरत असलेल्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांना सुधारीत वित्तीय अधिकार प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :एडीआर-२०१६/प्र.क्र.७२ /१६/आयु-२**
गो.ते.रुग्णालय संकुल, ९ वा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १४ नोव्हेंबर, २०१८

**वाचा :-** १) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक एडीआर-२०१६/प्र.क्र.७२/१६/आयु-२, दिनांक ३० ऑक्टोबर, २०१७
२) शुध्दीपत्रक, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक एडीआर-२०१६/प्र.क्र.७२/१६/आयु-२, दिनांक २३ फेब्रुवारी, २०१८

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा येथील अ.क्र.१ येथील दि.३०.१०.२०१७ चा शासन निर्णय व अ.क्र.२ येथील दि.२३.०२.२०१८ च्या शुध्दीपत्रकान्वये राज्यातील ४ शासकीय आयुर्वेद महाविद्यालयाशी संलग्नीत रुग्णालयातील अधिष्ठातांना (प्रादेशिक कार्यालय प्रमुख) व प्रशासकीय वैद्यकीय अधिकारी (कार्यालय प्रमुख) यांना भाग-२ अन्वये वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. याबाबत वित्तीय अधिकार नियम १९७८ भाग-२ अ.क्र.४५, नियम क्र.१६९ मधील वित्तीय अधिकारान्वये अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेद महाविद्यालये (प्रादेशिक कार्यालय प्रमुख) यांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीतील खाटांची क्षमता (अ) १००० च्या वरील खाटांच्या क्षमतेकरीता व (ब) ५००-१००० पर्यंतच्या खाटांच्या क्षमतेकरीता अशा दोन टप्प्यात निश्चित करण्यात आली होती. सदर वित्तीय शक्ती ५०० पेक्षा कमी खाटा क्षमता असलेल्या प्रादेशिक कार्यालय प्रमुख यांना लागू पडत नसल्याने सदर वित्तीय अधिकार सुधारीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

वित्तीय अधिकार प्रदान समितीच्या शिफारशीवरुन संबंधित प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग व या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील आयुष संचालनालय, मुंबई तसेच संचालनालयांतर्गत प्रादेशिक कार्यालय प्रमुख, कार्यालय प्रमुख म्हणून कार्यरत असलेल्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांना या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रामधील स्तंभ-७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे यापूर्वी या वित्तीय शक्तीसाठी लागू असलेल्या अटी कायम ठेवून सुधारीत वित्तीय अधिकार प्रदान करण्यास याद्वारे शासन मंजूरी देत आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे प्रदान करण्यांत आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर हा विविध वित्तीय प्रकाशनांमध्ये अंतर्भूत असलेले नियम आणि विनियम यामधील अटींच्या व शर्तींच्या अधीन, तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कार्यकारी आदेशांतर्गत अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात यावा.

३. या वित्तीय अधिकारांचा वापर करुन मंजूरी प्रदान करताना, ज्याप्रकरणी विशिष्ट मानके (स्टॅण्डर्ड) अथवा विशिष्ट सूत्र विहित केलेले असेल, अशा प्रकरणी त्या विहित मानकांचे/सूत्रांचे अनुसरण करण्यात यावे.

४. प्रदत्त शक्तींचा वापर करुन दिल्या जाणाऱ्या मंजूरीबाबतचा प्रत्येक आदेश संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करावेत व संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने ते आदेश निर्गमित केले आहेत असा स्पष्ट उल्लेख प्रत्येक मंजूरी आदेशात करण्यात यावा.

५. या वित्तीय अधिकारांचा वापर करुन मंजूरी आदेश निर्गमित करताना सक्षम प्राधिकाऱ्याने सदर मंजूरी आदेशाची प्रत इतर सर्व संबंधित अधिकाऱ्यांप्रमाणे, संबंधित लेखा परीक्षक व लेखा अधिकाऱ्याला पाठवावी व अशा मंजूरी आदेशांमध्ये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-२ मधील संबंधित वित्तीय शक्तींचा अनुक्रमांक / शासन निर्णयाचा क्रमांक ,दिनांक व त्यासोबतच्या परिशिष्टातील वित्तीय शक्तींचा अनुक्रमांक याचा न चुकता स्पष्ट उल्लेख करावा.

६. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रातील वित्तीय शक्ती, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-२ द्वारा प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा एक भाग म्हणून समजण्यात यावा. ज्यावेळी भाग-२ चे प्रकाशन छापले जाईल, त्यावेळी त्यात या शक्तींचा अंतर्भाव करण्यात येईल.

७. या शासन निर्णयामुळे प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करताना त्या त्या अधिकारांपुढे नमूद केलेल्या विहित अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन केले जाईल याबाबत संबंधित विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालयप्रमुख व कार्यालयप्रमुख तसेच प्रशासनिक विभागाने दक्षता घ्यावी.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१५/१८/विनियम दि.२६.०९.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्रमांक २०१८१११७१६२८०८५२१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Dhananjay Mahesh Nayak
Date: 2018.11.17 16:39:44 +05'30'

**(ध.म.नायक)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.मंत्री, (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.राज्यमंत्री, (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई व सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

६) संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.

७) सर्व अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेद महाविद्यालय व संलग्नित रुग्णालये तसेच शासकीय आयुर्वेद व युनानी रसशाळा, नांदेड

८) प्रशासकीय वैद्यकीय अधिकारी, शासकीय होमिओपॅथीक रुग्णालय, विलेपार्ले, मुंबई.

९) सहाय्यक संचालक आयुष, नवी मुंबई/पुणे/नागपूर.

१०) वित्त विभाग, (विनियम/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.

११) निवड नस्ती आयु-२

**वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ अन्वये वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिनस्त आयुष संचालनालयास प्रदान करण्यात येणाऱ्या वित्तीय शक्तींचे प्रपत्र**

| अ.क्र. | नियम क्र. | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम अधिकारी | वै.शि. व औ.द्र.विभाग दि.२३.०२.२०१८ च्या शासन शुध्दीपत्रका नुसार प्रचलीत मर्यादा | विभागाने प्रस्तावित केलेली मर्यादा | वित्त विभागाने प्रस्तावित केलेली मर्यादा | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ४५ | १६९ | शासकीय रुग्णालयात होणाऱ्या औषधी/ सर्जिकल बाबींचा पुरवठा तसेच विविध प्रयोगशाळांना लागणारी रसायने, रुग्णांच्या आहारासाठी लागणारे खाद्यपदार्थ शासनाने ठरवून दिलेल्या दराने खरेदी करणे. | १) प्रशासकीय विभाग, (सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग) | (१) पूर्ण अधिकार | (१) पूर्ण अधिकार | (१) पूर्ण अधिकार | |
| | | | २) विभाग प्रमुख (संचालक, आयुष संचालनालय, मुंबई) | (२), (३) व (४) यांचेकरीता संचालक, आयुष संचालनालय, प्रतिमाह रु.२०.०० लक्ष पर्यंत | (२), (३) व (४) यांचेकरीता संचालक, आयुष संचालनालय, प्रतिमाह रु.२०.०० लक्ष पर्यंत | (२), (३) व (४) यांचेकरीता संचालक, आयुष संचालनालय, प्रतिमाह रु.२०.०० लक्ष पर्यंत | |
| | | | ३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख (अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेद महाविद्यालये व संलग्नित रुग्णालये व रसशाळा व सहाय्यक संचालक, आयुर्वेद, नवी मुंबई/पुणे/नागपूर) | अ) अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेद महाविद्यालये प्रतिमाह रु.२०.०० लक्ष पर्यंत (१००० वरील खाटांच्या क्षमतेकरीता)<br>ब) अधिष्ठाता शासकीय आयुर्वेद महाविद्यालये प्रतिमहा रु.१०.०० लक्ष पर्यंत (५००-१०००) खाटांची क्षमता. | अ) अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेद महाविद्यालये व संलग्नित रुग्णालये प्रतिमाह रु.५.०० लक्ष पर्यंत (१५१-५०० पर्यंतच्या खाटांच्या क्षमतेकरीता) | अ) अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेद महाविद्यालये व संलग्नित रुग्णालये प्रतिमाह रु.५.०० लक्ष पर्यंत (१५०-५०० पर्यंतच्या खाटांच्या क्षमतेकरीता) | प्रधान सचिव (ले.व को.) यांनी दिलेल्या निर्देशानुसार विभागाने स्तंभ-५ मधील प्रादेशिक कार्यालय प्रमुख यांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय मर्यादा व खाटांच्या संख्येत व कार्यालय प्रमुख यांच्या साठी केवळ खाटांच्या संख्येत बदल करुन स्तंभ-६ प्रमाणे सुधारीत प्रस्ताव फेरसादर केलेला आहे. यामध्ये प्रादेशिक कार्यालय प्रमुख |
| | | | ४) कार्यालय प्रमुख, (प्रशासकीय वैद्यकीय अधिकारी) | क) कार्यालय प्रमुख यांना प्रतिमहा रु.२.०० लक्ष पर्यंत (खाटांची क्षमता ५०० पर्यंत) | ब) कार्यालय प्रमुख यांना प्रतिमहा रु.२.०० लक्ष पर्यंत (खाटांची क्षमता १५० पर्यंत) | ब) कार्यालय प्रमुख यांना प्रतिमहा रु.२.०० लक्ष पर्यंत (खाटांची क्षमता १५० पर्यंत) | |

| अ.क्र. | नियम क्र. | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम अधिकारी | वै.शि. व औ.द्र.विभाग दि.२३.०२.२०१८ च्या शासन शुध्दीपत्रका नुसार प्रचलीत मर्यादा | विभागाने प्रस्तावित केलेली मर्यादा | वित्त विभागाने प्रस्तावित केलेली मर्यादा | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | (अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेद महाविद्यालये व संलग्नित रुग्णालये) यांच्यासाठीचे पूर्वीचे स्तंभ-५ मधे असलेले "अ" व "ब" हे दोन टप्पे वगळून स्तंभ-६ प्रमाणे एकच टप्पा "अ" प्रस्तावित केला आहे. विभागाची गरज पाहता विभागाने प्रस्तावित केल्याप्रमाणे वित्त विभागाकडून स्तंभ-७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहे. |

Digitally signed by Dhananjay Mahesh Nayak
Date: 2018.11.17 16:40:12 +05'30'

**( ध.म.नायक )**
**अवरसचिव, महाराष्ट्र शासन**